प्रादेशिक पर्यटन विकास योजना सन २०२२-२३ अंतर्गत प्रशासकीय मान्यता दिलेल्या कामांची मान्यता रद्द नवीन कामांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक टिडीएस २०२४/०६/प्र.क्र.१३३/पर्यटन-१,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : १३ ऑगस्ट, २०२४.

**संदर्भ :-** १. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र.टिडीएस-२०२२/०६/प्र.क्र.३९२/पर्यटन, दि.२८.०६.२०२२.
२. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र.टिडीएस २०२३/०३/प्र.क्र.९८/पर्यटन, दि.२१.०३.२०२३

**शासन निर्णय :**

पर्यटन स्थळांच्या ठिकाणी पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी प्रादेशिक पर्यटन योजनेंतर्गत सन २०२२-२३ मध्ये संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये खालील तक्त्यामध्ये नमूद केलेल्या छ.संभाजीनगर जिल्ह्यातील रु.२००.०० लक्षच्या कामांना प्रशासकीय मान्यता देऊन रु.६०.०० लक्ष इतका निधी जिल्हाधिकारी, छ. संभाजीनगर यांना वितरीत करण्यात आला. सं.क्र. २ अन्वये सदर कामाची कार्यान्वयीन यंत्रणा जिल्हा परिषद छ.संभाजीनगर करण्यात आली होती.

**(रुपये लक्षात)**

| अ.क्र.व जिल्हा | कामे | प्रशासकीय मान्यता | वितरीत केलेला निधी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १) छ. संभाजी नगर | रामेश्वर मंदिर कायगांव ता. गंगापूर येथे घाट बांधणे व सुशोभिकरण करणे | २००.०० | ६० |
| | **एकूण** | **२००.००** | **६०.००** |

०२. वरील तक्त्यामधील नमूद रु.२००.०० लक्षच्या कामांची प्रशासकीय मान्यता या आदेशान्वये रद्द करण्यात येत असून त्याऐवजी खालील तक्यामधील रु.२००.०० लक्षच्या कामांना प्रशासकीय मान्यता देऊन वरील कामांसाठी वितरीत केलेला रु. ६०.०० लक्ष निधी खालील तक्त्यातील कामांना खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु.लक्षात)**

| अ.क्र. | कामाचे नाव (जि. छ. संभाजीनगर) | अंदाजित किंमत |
|---|---|---|
| १. | मौजे शिवूर ता. वैजापूर येथे श्री. शंकरस्वामी महाराज मंदिर प्रवेशद्वार, एन.एच. ७५२ ते श्री. श्री. शंकरस्वामी महाराज मंदिर रस्ता, श्री. शंकरस्वामी महाराज मंदिर परिसरात बांधकाम पुर्ण झालेल्या हनुमान मंदिरा समोर सार्वजनिक सभागृह बांधकाम व परिसर सुशोभिकरण करणे. | २००.०० |
| | **एकूण** | **२००.००** |

०३. उपरोक्त कामांबाबत इतर अटी व शर्ती संदर्भाधिन शासन निर्णयाप्रमाणेच लागू राहतील.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८१३१५४७२५१९२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SANTOSH VITHAL ROKADE

Digitally signed by SANTOSH VITHAL ROKADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=ca5751ffedbb005fdff34ab6ac1f8319d061483d7d35e20f744e251360f7920a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=ECF4A9ABE84C70DE989C3669424C12B6CADCB583D500FE489CE8727916E0BBEE, cn=SANTOSH VITHAL ROKADE
Date: 2024.08.13 16:02:37 +05'30'

**( संतोष वि. रोकडे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई

२. महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर

३. महालेखापाल, (स्थानिक निकाय लेखापरीक्षा व लेखा), मुंबई.

४. संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

५. जिल्हाधिकारी, छ. संभाजीनगर

६. जिल्हा नियोजन अधिकारी, छ. संभाजीनगर

७. जिल्हा कोषागार अधिकारी, छ. संभाजीनगर

८. नियोजन विभाग (कार्यासन-१४११/१४४४), मंत्रालय, मुंबई.

९. वित्त विभाग (का.व्यय-१५/ अर्थसंकल्प) मंत्रालय, मुंबई.

१०. निवड नस्ती, कार्यासन-पर्यटन.

***